सेवा भरती

संवर्गाच्या पदसंख्येला सेवाभरतीचे प्रमाण लावणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक एसआरव्ही-1094/प्र.क्र.4/94/बारा,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 7 मार्च 1996.

**शासन निर्णय**

शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः एसआरव्ही-1069/ड, दिनांक 26 मार्च 1970 अन्वये शासन सेवेतील निरनिराळ्या सेवेतील/संवर्गातील/श्रेणीमधील पदांवर सेवाभरती करताना पदोन्नती आणि नामनिर्देशन या दोन मार्गांनी करावयाच्या सेवाभरतीचे प्रमाण काय असावे, याबाबतचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. तथापि, हे प्रमाण संबंधित संवर्गातील एकूण मंजूर पदांच्या संख्येला लावावे की प्रत्येकवेळी सेवाभरती करताना उपलब्ध होणा-या पदांच्या संख्येला लावावे याबाबत संदिग्धता राहिलेली आहे. या प्रश्नाबाबत सम्यक विचार करून सेवाभरतीचे प्रमाण विहित करण्याबद्दल खालीलप्रमाणे सुधारित धोरण निश्चित करण्यात यावे, असे शासनाचे आदेश आहेत :-

1. (अ) शासन सेवेतील निरनिराळ्या वेतनश्रेणीं मधील आणि गटांमधील पदांवर पदोन्नती आणि नामनिर्देशन या मार्गांनी करावयाच्या सेवाभरतीचें प्रमाण यापूर्वीच, सेवाप्रवेश नियमांत विवक्षित तरतूद अंतर्भूत करून निश्चित केले नसेल तर हे प्रमाण पुढील आदेश होईपर्यन्त शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः एसआरव्ही-1069/ड, दिनांक 26 मार्च 1970 अन्वये निश्चित केलेल्या प्रमाणानुसार निश्चित करण्यात यावे आणि त्याप्रमाणे त्या त्या पदांच्या सेवाप्रवेश नियमांत योग्य ती तरतूद करावी. तसेच हे प्रमाण शक्यतो निश्चित स्वरूपाचे असावे.

(ब) हे प्रमाण त्या त्या संवर्गामधील कायम ( Permanent ) आणि हंगामी (Temporary ) अशा दोन्ही स्वरूपाच्या एकूण मंजूर पदांच्या पदसंख्येला लावण्यात यावे.

2. महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, 1981 च्या नियम 9 (5) मध्ये "संवर्ग" या संज्ञेची व्याख्या दिली आहे, ती व्याख्या खालीलप्रमाणे सुधारण्यात यावी:-

"संवर्ग म्हणजे एक स्वतंत्र घटक म्हणून, मंजूर केलेली एखाद्या सेवेतील किंवा सेवेच्या भागातील "कायम, त्याचप्रमाणे वेळोवेळी मंजूर केलेली हंगामी" पदे यांचा समूह म्हणून समजण्यात येईल."

3. पदोन्नती आणि नामनिर्देशन या मार्गांनी करावयाच्या सेवाभरतीचे प्रमाण संवर्ग संख्येच्या एकूण मंजूर पद-संख्येला लावावयाचे असल्यामुळे, हे प्रमाण समतोल रहावे, यासाठी प्रत्येक 2 वर्षांनी "1 एप्रिल प्रतिवर्षी" हा आधारभूत दिनांक धरून त्या संवर्गाचे पुनर्विलोकन करण्यात यावे, त्यानुसार हे आदेश निर्गमित झाल्यानंतर प्रथम पुनर्विलोकन दिनांक 1 एप्रिल 1996 या आधारभूत दिनांकाने करण्यात यावे. या दिनांकास विद्यमान सेवाप्रवेश नियमात विहित केलेल्या प्रमाणकानुसार किंवा जिथे प्रमाण विहित केले नसेल त्याप्रकरणी वर नमूद केलेल्या परिपत्रकानुसार निश्चित केलेल्या प्रमाणानुसार, त्या संवर्गामध्ये त्या त्या मार्गानी सेवाभरती झाली आहे की नाही याचा आढावा घेण्यात यावा. आढावा घेतल्यानंतर एखाद्या मार्गानी करावयाच्या सेवाभरतीचा अनुशेष असल्याचे दिसून आल्यास तो भरून काढण्यासाठी तात्काळ उपाययोजना करण्यात यावी.

4. प्रत्येक पुनर्विलोकनाच्या वेळी 3 वर्षे किंवा त्यापेक्षा अधिक कालावधीसाठी नियमित आस्थापनेवरील "हंगामी" पदे चालू असल्याचे आढळून आल्यास, त्यांपैकी 80% इतकी पदे वित्त विभागाच्या सहमतीने कायम करावी.

5. अशा पुनर्विलोकनाच्या वेळी एखाद्या मार्गाने केलेल्या नेमणुका विहित प्रमाणापेक्षा अधिक आढळून आल्यास, त्या नेमणुका अभावित म्हणून समजण्यात याव्यात.

2. महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, 1981 च्या नियम 9 (5) मध्ये सुधारणा करण्या-बाबतची कार्यवाही करण्यात येईल. तोपर्यन्तच्या कालावधीत वरील परिच्छेद (दोन) मध्ये नमूद केल्याप्रमाणे तरतूद अंमलात राहील.

(कृ.मा.प.)

3. हे आदेश 1 एप्रिल 1996 पासून अंमलात येतील. या दिनांकापूर्वी प्रादेशिक निवड मंडळे किंवा लोकसेवा आयोग यांचेकडे नामनिर्देशनाने सेवाभरती करण्यासाठी जी मागणीपत्रे पाठविली असतील त्यामध्ये बदल करण्याची आवश्यकता नाही.

4. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक 14/96/सेवा-4, दिनांक 6 जानेवारी 1996 अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

के. सी. श्रीवास्तव,
प्रधान सचिव (सेवा),
सामान्य प्रशासन विभाग.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
उप मुख्य मंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
* प्रबंधाक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधाक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधाक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग (सामान्य प्रशासन विभाग धरून),
निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
वित्त विभाग, कार्यासन सेवा- 4,
निवड नस्ती.

---

* पत्राने.

------------